ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२२/प्र.क्र.१३६/योजना-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३० मार्च, २०२३

**वाचा :-**

१. ग्राम विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.I.१२०११//१९/२००८-SGSY(C), दिनांक ०७.०१.२००९.
२. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जी-२००११/६/२०१५-आरएल (Computer No.३४४२१४)-०७, दिनांक २६ डिसेंबर, २०२२.
३. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२२/प्र.क्र.१३६/योजना-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०२३.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/७५०/२०२२, दिनांक २८ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत राबविण्यात येणाऱ्या ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या १००% केंद्र पुरस्कृत योजनेकरीता दिनांक २६.१२.२०२२ च्या आदेशान्वये रु.२६,४७,८२,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२२-२३ मध्ये ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या योजनेसाठी केंद्र हिस्सा (२५०१ ए१४६) याकरिता रु.२२,००,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आल्याने रु.२६,४७,८२,०००/- पैकी रु.२२,००,००,०००/- इतका निधी संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. उर्वरित रु.४,४७,८२,०००/- एवढा निधी पुनर्विजिनयोजनाद्वारे नियोजन व वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या योजनेसाठी केंद्र हिस्सा (२५०१ ए१४६) करिता नियोजन व वित्त विभागाने पुनर्विनियोजनद्वारे उपलब्ध करुन दिलेला रु.४,४७,८२,०००/- (रुपये चार कोटी सत्तेचाळीस लाख ब्याऐंशी हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.४,४७,८२,०००/- चा खर्च "मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१)(१८) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्थांना वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा १०० टक्के) (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ ए१४६)" या लेखाशिर्षाखाली नियोजन व वित्त विभागाने पुनर्विनियोजनद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभागयांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र, ५) कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याची संबंधीत अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी, अन्यथा त्यांच्यावर शासन स्तरावरुन कारवाई केली जाईल, ६) सदर अनुदान सशर्त असून यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१६९/२०२३/व्यय-१५, दिनांक २७.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०११४६५९२०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2023.03.30 12:46:57 +05'30'

**( अरुण व शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग(एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) कक्ष अधिकारी (१४४४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय,मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२,ग्राम विकास विभाग.
१०) निवडनस्ती.